सन २०११-१२ या शैक्षणिक वर्षापासून नवीन
महाविद्यालये (व्यावसायिक व पारंपारिक) /
अर्ज मागविण्याची कार्यपध्दती

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
शासन निर्णय क्रमांक एनजीसी २०१०/(१९३/१०)/ मशि ४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ५ फेब्रुवारी ,२०११

**वाचा** : शासन निर्णय क्र. एनजीसी २०१०/(१९३/१०)/ मशि ४, दिनांक ३० ऑक्टोबर, २०१०

**परिपत्रक :-**

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ च्या कलम ८२ (४) मधील तरतूदीनूसार सन २००८-०९, २००९-१० व २०१०-११ या शैक्षणि वर्षामध्ये नवीन महाविद्यालयाचे प्रस्ताव राज्यातील अकृषी विद्यापीठांकडून शासनास प्राप्त झाले होते. सदर प्रस्तावांची शासन स्तरावर छाननी केली असता त्यामध्ये खालील प्रमाणे त्रृट्या आढळून आलेल्या आहेत.

१) संस्थेकडे पायाभूत सूविधा कमी प्रमाणात असणे उदा. (वर्ग खोली पुरेशी नसणे, प्रयोगशाळा नसणे, खेळाचे मैदान नसणे, ग्रंथालय नसणे)
२) विद्यापीठाकडे अर्ज सादर करते वेळेस इमारतीचे बांधकाम सुरु असणे, परंतु पूर्ण झालेल्या बांधकामाचा तपशिल नसणे.
३) संस्थेस शैक्षणिक अनुभव नसणे.
४) संस्थेने प्रस्तावित महाविद्यालयांकरीता जी भाड्याची इमारत घेतलेली आहे त्या इमारतीमध्ये भाडेकरु राहत असल्याचे आढळूण येणे.
५) संस्थेकडे जमीन व इमारत भाड्याची असणे, भाडेपत्र वेगवेगळे दिसून येणे, जागा असणे पण शेतीची असणे.
६) संस्थेची आर्थिक स्तिती चांगली नसणे.
७) अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयातील विद्यार्थी संख्या मान्य प्रवेश क्षमतेपेक्षा कमी आढळून येणे.
८) प्रस्तावासोबत अंकेक्षण विवरण पत्र नसणे.
९) विज्ञान विद्या शाखेतील विद्यार्थ्यांकरीता प्रयोगशाळा व प्रयोगशाळेकरीता आवश्यक साहित्य उपलब्ध नसणे.
१०) संस्थेने अर्जामध्ये जागेसंबंधी व इमारती संबंधी दिलेली माहिती चूकीची असणे.

२. नवीन महाविद्यालयाच्या प्रस्तावात वरील प्रमाणे त्रृटी आढळून आल्याने सन २०११-१२ या शैक्षणिक वर्षापासून नवीन महाविद्यालये (पारंपारिक व व्यावसायिक) मंजूरीसाठी अर्ज मागविण्याच्या कार्यपध्दतीमध्ये दि. ३०/१०/२०१० च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीप्रमाणे नवीन महाविद्यालयांना मान्यता देण्यासाठी विहित केलेल्या कार्यपध्दतीचा वापर करण्यात यावा.

F:\193-10.doc

३. राज्यातील सर्व अकृषी विद्यापीठांनी वरील शासन निर्णयाचे काटेकोरपणे पालन करणे आवश्यक आहे. त्यासाठी विद्यापीठाने नवीन महाविद्यालयांना शिफारस करताना Arbitrarily शिफारस करु नये, सदर शासन निर्णयातील तरतूदीप्रमाणे विद्यापीठाकडून कार्यवाही झाली नाही तर त्याबाबत संबंधीत विद्यापीठाला जबाबदार धरण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.

हे परिपत्रक, राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक 201102071512170001 आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

(विजय गो. चांदेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रती,
संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय सहसंचालक, महाराष्ट्र राज्य
सर्व कुलसचिव, अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य
मशि / विशि तील सर्व कार्यासने, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती मशि ४